**राज्य योजना सन २०२२-२३**
**गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या योजनेतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०९.२२/प्र.क्र.२३१/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०१ मार्च, २०२३.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/चाबाप्र/प्र.क्र.६६/२९२/२०२२-२३, दिनांक २९.०८.२०२२.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०९.२२/प्र.क्र.२३१/फ-१, दिनांक १५.०९.२०२२.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०९.२२/प्र.क्र.२३१/फ-१, दिनांक १९.१०.२०२२.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०९.२२/प्र.क्र.२३१/फ-१, दिनांक २८.११.२०२२.

**प्रस्तावना :-**

सन २०२२-२३ आर्थिक वर्षाकरिता गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या लेखाशिर्षा अंतर्गत एकूण रु. १००००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२२ ला अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

३. संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये सन २०२२-२३ करीता प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या योजनेतंर्गत रू. ८१३९.३४ लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यानुसार संदर्भ क्रमांक ३ व ४ च्या शासन निर्णयान्वये सदर लेखाशिर्षांतर्गत रु. ४९००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. आता संदर्भ क्रमांक १ च्या वित्त विभागाचा शासन निर्णय लक्षात घेवून शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १ चे परिपत्रक विचारात घेता व प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या लेखाशिर्षातर्गत **रु. २१००.०० लक्ष** निधी सोबत जोडलेल्या तक्त्यातील कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटी व शर्तीचे अधिन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

i. प्रस्तावीत खर्च:- लेखाशिर्ष ४४०६, वनीकरण व वन्य जीवन यांवरील भांडवली खर्च ०२, पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, १११ प्राणी संग्रहालय, (००) (०१) गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (राज्य) ४४०६ ३८५८ या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

ii. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच, प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी वितरीत करावा.

iii. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

iv. प्रस्तावित असलेल्या मोठ्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची जबाबदारी संबंधित नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

v. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

vi. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०११८२६१८००१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.03.02 16:31:20 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम. लि., नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
५. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०९.२२/प्र.क्र. २३१/फ-१, दिनांक : ०१ मार्च, २०२३ सोबतचे विवरणपत्र.**

**(रक्कम रु. लाखात)**

| अ.क्र. | कामाचा तपशिल | प्रस्तावित रक्कम | आतापर्यत वितरत निधी | सदर शासन निर्णयान्वये वितरीत निधी. |
|---|---|---|---|---|
| १ | गोरेवाडा येथे तृणभक्षी वन्यप्राण्यांकरीता खाद्यपदार्थ आणि रिटायरिंग क्षेत्रासह आफ्रिकन प्राणीसंग्रहालयाच्या बाह्य कुंपणाचे बांधकाम. | १४३६.५७ | | |
| २ | गोरेवाडा करीता पाणीपुरवठा योजना आणि इतर विद्यमान इंडियन सफारी डांबरी रस्ता बांधणे आणि गोरेवाडा प्राणीसंग्रहालयाची अतिरीक्त कामे. | १३६६.८५ | | |
| ३ | गोरेवाडा प्रकल्प, नागपूर येथील आफ्रिकन प्राणीसंग्रहालयात आफ्रिकन सिंह, चित्ता, बबून आणि हायना या वन्यप्राण्यांकरिता विविध सुविधा उभारणे. | १३६४.२२ | ४९००.०० | १८३२.०० |
| ४ | गोरेवाडा येथील आफ्रिकन प्राणीसंग्रहालय अंतर्गत डांबरी रस्ता बांधणे व हिप्पोपोटॅमस एन्क्लोजर बांधणे. | १४९४.३७ | | |
| ५ | वन्यप्राणी बचाव केंद्राचे व गोरेवाडा आंतरराष्ट्रीय प्राणी उद्यान नागपूर येथील रखरखावट, परीरक्षण मनुष्यबळ पुरवठा, (वन्यप्राण्याकरीता दैनंदिन खाद्य, औषधी, कार्यालयीन खर्च, वैद्यकीय उपकरणे/ इतर उपकरणे) इत्यादी | १०६९.९९ | | |
| ६ | वन्यजीव बचाव केंद्र, गोरेवाडा येथे वन्यजीव आणि जीवशास्त्र प्रयोगशाळेचे बांधकाम करणे. | १६८.०० | | |
| ७ | गोरेवाडा Jungle Drive मधील रस्त्याची सुधारणा (Strengthening / repair). | १९६.१२ | | |
| ८ | गोरेवाडा Jungle Drive मधील रस्त्याच्या छेद प्रवाहांची कामे (Cross drainage works) | १९९.५० | | |
| ९ | बाळासाहेब ठाकरे गोरेवाडा आंतरराष्ट्रीय प्राणी उद्यान, नागपूर येथे पर्यटनासंबधी व प्राण्यांसंबंधीत वाहने खरेदी करणे. | २००.०० | | |
| १० | गोरेवाडा प्रकल्प, नागपूर अंतर्गत अधिवास व्यवस्थापन, तणनिर्मुलन व रोपवाटिका तयार करणे. | ५०.०० | ०.०० | २६८.०० |
| ११ | गोरेवाडा प्रकल्प, नागपूर अंतर्गत वन्यप्राणी बचाव केंद्र मध्ये Tiger Unit No. ३ चे बांधकाम करणे. | १५९.३४ | | |
| १२ | गोरेवाडा प्रकल्प, नागपूर अंतर्गत वन्यप्राणी बचाव केंद्र मध्ये Leopard Cell Unit No. ५ चे बांधकाम करणे. | १३४.९५ | | |
| १३ | गोरेवाडा प्रकल्प, नागपूर अंतर्गत वन्यप्राणी बचाव केंद्र मध्ये Tiger Cell Unit No. ४ चे बांधकाम करणे. | १६१.९१ | | |
| १४ | गोरेवाडा प्रकल्प, नागपूर अंतर्गत वन्यप्राणी बचाव केंद्र मध्ये Leopard Cell Unit No. ६ चे बांधकाम करणे. | १३७.५२ | | |
| | **एकूण** | **८१३९.३४** | **४९००.००** | **२१००.००** |